



**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
मंत्रालय विस्तार इमारत, दालन क्र.५५७, ५ वा मजला
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दूरध्वनी क्रमांक-०२२-२२७९४२५७ Email ID : Desk14b.gad-mh@gov.in

क्रमांक : कअनि-११२४/प्र.क्र.१८/प्रशा-२(१४ब) दिनांक:- २० मार्च, २०२४

**प्रति,**

सह/उप सचिव (आस्थापना)
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

**विषय:-गृहनिर्माण विभागाच्या अधिपत्याखालील सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालयाच्या कार्यालयातील "अधीक्षक गट-ब" (राजपत्रित) हे पद प्रतिनियुक्तीने भरण्याकरिता मंत्रालयीन संवर्गातील कक्ष अधिकारी यांच्याकडून इच्छुकता मागविण्याबाबत**

**संदर्भ:-**१) सा.प्र.वि.शा.नि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का-१२,दि.१७.१२.२०१६
२) सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/का-१२,दि.१६.०२.२०१८
३) सा.प्र.वि.शा.नि.क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या-१४, दि.३१.०८.२०१७

**महोदय/महोदया,**

संदर्भाधिन क्र.१ येथील दिनांक १७.१२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, संदर्भाधिन क्र.२ येथील दिनांक १६.०२.२०१८ च्या शासन निर्णयान्वये सदर धोरणामध्ये सुधारणा करण्यात आली आहे. तसेच दिनांक ३१.८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे.

२. सदर कार्यपध्दतीनुसार गृहनिर्माण विभागाच्या अधिपत्याखालील सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, कोकण, पुणे, छत्रपती संभाजीनगर, अमरावती व नागपूर या कार्यालयातील "**अधीक्षक गट-ब" (राजपत्रित) [वेतनश्रेणी-६ व्या वेतन आयोगानुसार ९३००-३४८००+ ग्रेड पे ४४००]** हे पद प्रतिनियुक्तीने भरण्यासाठी सर्व मंत्रालयीन विभागांतील कक्ष अधिकाऱ्यांकडून इच्छुकता मागविण्यात येत आहे. याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | पदनाम | प्रतिनियुक्तीने भरावयाची रिक्त पदे |
|---|---|---|---|
| १. | सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, कोकण (वांद्रे, मुंबई) | अधीक्षक गट-ब (राजपत्रित) | १ |
| २. | सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, पुणे | | १ |
| ३. | सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, छत्रपती संभाजीनगर | | १ |
| ४. | सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, अमरावती | | १ |
| ५. | सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, नागपूर | | १ |
| **एकूण प्रतिनियुक्तीने भरावयाची पदे** | | | ५ |

३. उपरोक्त नमूद पद मंत्रालयीन संवर्गातील कक्ष अधिकाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने भरण्याकरिता सदर जाहिरात प्रसिध्द करण्यात येत असल्याने या जाहिरातीस अनुसरुन क्षेत्रिय कार्यालयातील अधिकाऱ्यांनी सदर पदांकरिता या विभागाकडे अर्ज सादर करु नयेत व असे अर्ज सादर करण्यात आल्यास ते विचारात घेतले जाणार नाहीत, तसेच त्याबाबत संबंधितांस काहीही उत्तर कळविण्यात येणार नाही.

४. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक १७.१२.२०१६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ५ (अ) ७ मध्ये नमूद केल्यानुसार कक्ष अधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांचा परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण होऊन त्यानंतर त्यांचा किमान ५ वर्षे सेवा कालावधी पूर्ण झालेला नाही, अशा अधिकाऱ्यांची या विभागाकडे शिफारस करण्यात येऊ नये.

५. उपरोक्त पदासाठी प्रतिनियुक्तीवर जाण्यास इच्छुक असलेल्या मंत्रालयीन संवर्गातील कक्ष अधिकाऱ्यांनी परस्पर या विभागाकडे अर्ज सादर करु नयेत. त्यांनी आपआपल्या विभागामार्फत अर्ज सादर करावेत. परस्पर अर्ज सादर केल्यास त्या अर्जांचा विचार करण्यात येणार नाही व त्याबाबत संबंधितांस काहीही उत्तर कळविण्यात येणार नाही.

६. सर्व संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी इच्छुक कक्ष अधिकाऱ्यांचे अर्ज प्राप्त झाल्यानंतर संदर्भाधिन शासन निर्णयातील तरतूदीनुसार अर्जांची छाननी करुन आपल्या विभागाच्या सचिवांच्या मान्यतेने इच्छुक कक्ष अधिकाऱ्यांचा प्रतिनियुक्तीचा प्रस्ताव सोबत जोडलेल्या प्रपत्रातील माहिती व मागील पाच वर्षाच्या परिपूर्ण गोपनीय अहवालांच्या छायांकित प्रतीसह या कार्यासनाकडे **दिनांक १०.०४.२०२४** पर्यंत पोहोचतील अशा रीतीने पाठवावा. (नोंदणी शाखेत पाठवू नये)

७. एकदा निवड झालेल्या कक्ष अधिकाऱ्यांस त्याचे नांव मागे घेता येणार नाही. तसेच, आपल्या विभागातून सदर पदावर प्रतिनियुक्तीसाठी जाण्यास कोणीही कक्ष अधिकारी इच्छुक नसल्यास तसेही कृपया **दिनांक १०.०४.२०२४** पर्यंत या विभागास कळविण्यात यावे.

८. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी सदरचे पत्र त्यांच्या विभागातील सर्व कक्ष अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणावे.

सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३२०१६१७५८६७०७ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

आपला,

VIVEK RAMAKANT JADHAV

Digitally signed by VIVEK RAMAKANT JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=0c6f092192cae76ac289eef2587c5f28373c6e445e4552e27b340b424d48717c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F960CA130E1B6E0A979CBB41C7516CA46961184AD1E4ECE1A118390C02E6745E, cn=VIVEK RAMAKANT JADHAV
Date: 2024.03.20 16:28:17 +05'30'

(वि.र. जाधव)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) उपसचिव (गृनिधो-१), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई
२) निवड नस्ती/प्रशा-२(१४ब)

मंत्रालयीन संवर्गातील कक्ष अधिकाऱ्यांमधून गृहनिर्माण विभागाच्या अधिपत्याखालील सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालयाच्या कार्यालयातील **"अधीक्षक गट-ब" (राजपत्रित)** हे पद प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत

## <u>प्रतिनियुक्तीबाबतचे विहीत प्रपत्र</u>

<table>
<tr><td>१)</td><td>अधिकारी/कर्मचाऱ्याचे संपूर्ण नांव व पदनाम</td><td></td></tr>
<tr><td>२)</td><td>सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, कोकण, पुणे, छत्रपती संभाजीनगर, अमरावती व नागपूर या कार्यालयांपैकी कोणत्या कार्यालयात जाण्यास इच्छुक आहेत, त्या कार्यालयाचे नाव</td><td></td></tr>
<tr><td>३)</td><td>सध्या वेतन घेत असलेली वेतनश्रेणी</td><td></td></tr>
<tr><td>४)</td><td>जन्मदिनांक</td><td></td></tr>
<tr><td>५)</td><td>प्रथम नियुक्तीचा दिनांक</td><td></td></tr>
<tr><td>६)</td><td>कक्ष अधिकारी पदावरील नियुक्तीचा दिनांक</td><td></td></tr>
<tr><td>७)</td><td>सेवानिवृत्तीचा दिनांक<br>[पहा शा.नि.दिनांक १७-१२-२०१६ मधील तरतुद ५ (ब) (६)]</td><td></td></tr>
<tr><td>८)</td><td>शैक्षणिक अर्हता</td><td></td></tr>
<tr><td>९)</td><td>भ्रमणध्वनी क्रमांक</td><td></td></tr>
<tr><td>१०)</td><td>मागील ५ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत)</td><td></td></tr>
<tr><td>११)</td><td>मत्ता व दायित्व सादर केली आहेत का? (दि.३१.३.२०२३ रोजीचे)</td><td></td></tr>
<tr><td>१२)</td><td>५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास)</td><td></td></tr>
<tr><td>१३)</td><td>संबंधित अधिकारी/कर्मचाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (कालावधी, पद व ठिकाण)
<table>
<tr><td>दिनांकापासून ते दिनांकापर्यंत</td><td>पद</td><td>प्रतिनियुक्तीचे ठिकाण (कार्यालय)</td></tr>
<tr><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td></td><td></td><td></td></tr>
</table></td><td>प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी<br>------- वर्षे</td></tr>
<tr><td>१४)</td><td>संबंधित कर्मचाऱ्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु अथवा प्रस्तावित आहे काय?</td><td></td></tr>
<tr><td>१५)</td><td>मागील प्रतिनियुक्तीवरून परत आल्याच्या दिनांकापासून ३ वर्षे पूर्ण झाली आहेत का?</td><td></td></tr>
<tr><td>१६)</td><td>प्रतिनियुक्तीकरीता निवड झाल्यास विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे?</td><td></td></tr>
</table>

**(आस्थापना अधिकाऱ्याचे नांव,पदनाम व स्वाक्षरी)**